**"औद्योगिक प्रशिक्षण संस्थेच्या प्रशासकीय इमारत व कार्यशाळा बांधकाम व भूसंपादन" या चालू जिल्हास्तरीय सर्वसाधारण योजनेस नव्याने प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्रमांक प्रशामा-२०१०(३३८/१०)/व्यशि-२,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २६ नोव्हेंबर, २०१०

संदर्भ : १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक. जिवायो १००७/ प्र.क्र. ३९ / का-१४४४, दिनांक १६ फेब्रुवारी, २००८

२) नियोजन विभाग, शासन पत्र क्रमांक जिवायो २०१०/ प्र.क्र. ९७ / का, १४८१, दिनांक २० मे, २०१०.

३) संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालययांचे पत्र क्र.१४/एफवायपी/जिवायो/प्रशाइमा/२०११-१२, दिनांक २१ ऑक्टोंबर २०१०.

**प्रस्तावना :** "कामगार व कामगार कल्याण" (औ.प्र.संस्था) या विकासक्षेत्राखालील जिल्हास्तरीय सर्वसाधारण योजनेंमार्फत औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये प्रशिक्षणासाठी पायाभूत सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी **"औद्योगिक प्रशिक्षण संस्थेच्या प्रशासकीय इमारत व कार्यशाळा बांधकामे व भूसंपादन"** ही योजना जिल्हास्तरावर राबविण्यांत येत आहे. या योजनेंमार्फत राज्यामध्ये कार्यरत असलेल्या औद्योगिक प्रशिक्षण संस्थांच्या कार्यशाळा व प्रशासकीय इमारतींच्या बांधकामांसाठी तसेच भूसंपादनासाठी निधी उपलब्ध करून दिला जातो.

२. सद्य:स्थितीत राज्यामध्ये ४१६ शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था कार्यरत आहेत. त्यापैकी २१७ औद्योगिक प्रशिक्षण संस्था स्वत:च्या इमारतींमध्ये कार्यरत आहेत. ११४ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांच्या इमारतींची बांधकामे सुरू आहेत व ८५ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांच्या भूसंपादनाची कार्यवाही सुरू आहे.

३. औ.प्र.संस्थेमध्ये प्रशिक्षण घेणारा विद्यार्थी प्राथम्याने आर्थिकदृष्टया दुर्बल घटकातील असतो. राज्यातील प्रत्येक तालुक्यामध्ये औ.प्र.संस्था कार्यरत आहेत. मात्र सर्व ठिकाणी औ.प्र.संस्थेची स्वत:ची इमारत नाही. ज्या ठिकाणी शासकीय इमारत नाही अशा ठिकाणी औ.प्र.संस्थेसाठी भाडयाची इमारत घ्यावी लागते. ही योजना राज्यात ब-याच वर्षापासून कार्यरत आहे. मात्र या योजने संदर्भातील शासन निर्णय उपलब्ध नाही.

४. ही जिल्हास्तरीय योजना असल्यामुळे याबाबतचा निधी अर्थसंकल्पित करणे व वितरीत करणे याबाबतची कार्यवाही जिल्हा नियोजन विकास समितीमार्फत करण्यांत येते. या योजनेस प्रशासकीय

मान्यता देण्याबाबतचा शासन निर्णय उपलब्ध करुन देण्याबाबत आग्रह धरण्यांत येत आहे, ही बाब लक्षांत घेऊन या योजनेस नव्याने प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** : उपरोक्त विवेचन लक्षांत घेऊन **"औद्योगिक प्रशिक्षण संस्थेच्या प्रशासकीय इमारत व कार्यशाळा बांधकाम व भूसंपादन"** या चालू जिल्हास्तरीय सर्वसाधारण योजनेस या शासन निर्णयाद्वारे नव्याने प्रशासकीय मान्यता देण्यांत येत आहे. या योजनेद्वारे उपलब्ध होणारा निधी खालील बाबीवर खर्च करण्यांत यावा.

अ) शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेच्या प्रशासकीय व कार्यशाळा इमारतींचे बांधकाम करणे.

ब) औद्योगिक प्रशिक्षण संस्थांच्या परिसराचे सुशोभिकरण व दुरूस्ती करणे.

क) औद्योगिक प्रशिक्षण संस्थांच्या इमारतींचे नुतनीकरण व दुरूस्ती, संरक्षण भिंतीचे बांधकाम व दुरूस्ती, अंतर्गत रस्ते दुरूस्ती करणे.

ड) औद्योगिक प्रशिक्षण संस्थांच्या जागांसाठी भूसंपादनाचा मोबदला देणे आणि अनुषंगिक प्रक्रीयेचा संपूर्ण खर्च भागविणे.

इ) अनुशेषातंर्गत दर्शविण्यात आलेल्या औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील चालू बांधकामे व नुतनीकरणाचे प्रस्ताव.

२. सदर योजना जिल्हास्तरीय असल्याने, जिल्हा नियोजन समितीकडे नियोजन विभागाकडून वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या मार्गदर्शक सूचनेनुसार नियतव्ययाची मागणी संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांनी करावी. तसेच निधी अर्थसंकल्पीत करणे, निधी वितरीत करणे तसेच खर्चाबाबत पाठपुरावा करण्याची जबाबदारी संचालक (प्रशिक्षण) व संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांची राहील. या शासन निर्णयान्वये प्रस्तूत योजनेसाठी संबंधित जिल्हयाचे जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांना जिल्हा नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यांत येत आहे.

३. भविष्यामध्ये हाती घेण्यांत येणा-या औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील बांधकामांसाठी जिल्हा नियोजन समितीकडून प्रशासकीय मान्यता घेणे बंधनकारक राहील.

४. या योजनेची अंमलबजावणी दिनांक १६ फेब्रुवारी, २००८ च्या नियोजन विभागाच्या शासन निर्णयामधील मार्गदर्शक सूचनेनुसार व या संदर्भात शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या व भविष्यात निर्गमित करण्यात येणा-या मार्गदर्शक सूचनेनुसार करण्यात यावी.

५. ही जिल्हास्तरीय योजना असल्याने या योजनेंतर्गत बांधकामे व भूसंपादन प्रक्रीयेचा खर्च भागविण्यासाठी जिल्हयाच्या मागणी क्रमाकांतंर्गत स्वतंत्र संगणक सांकेतांक जिल्हा नियोजन समिती मार्फत प्राप्त करून घेण्याची जबाबदारी संचालक (प्रशिक्षण ) व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांची राहील.

हा शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २१४/१४८१, दिनांक १/११/२०१० व ५४५/१४७, दि.४/११/२०१० अन्वये प्राप्त सहमतीने तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक विअप्र- १०.०८/ प्र.क्र.७०/२००८/ विनीयम, दि. १५ मे २००९ अन्वये सुधारीत करण्यांत आलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग तीन, अनुक्रमांक ४, नियम

क्रमांक २७(२) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदरहू शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१०११२६१४२६११०१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(सं.अ. बागेश्वर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति.

(१) संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, म.रा. मुंबई १.
(२) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर. (संचालनालयामार्फत)
(३) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती ----------- (संचालनालयामार्फत)
(४) जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालये (संचालनालयामार्फत)
(५) प्राचार्य, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था (संचालनालयामार्फत)
(६) नियोजन विभाग, मंत्रालय (का.क्र.१४७१/१४८१)
(७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
(८) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, कार्यासन क्रमांक साशि-१ व व्यशि-३
(९) निवड नस्ती (व्यशि-२) ३ प्रतीत)

निर्गमित
26/11/2010